बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातून नवी मुंबई किंवा ठाणे परिसरातील शासकीय कार्यालयात बदली झाल्यानंतर बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थाने रिक्त न करण्याबाबत तसेच, नवीन मुंबई किंवा ठाणे परिसरातील शासकीय कार्यालयांतून बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात बदली झाल्यानंतर शासकीय निवासस्थाने रिक्त न करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक-शानिवा-१५९३/४४३३/प्र.क.६६७/९३/२३-अ

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १० फेब्रुवारी, १९९४.

वाचा : १. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-शानिवा-१५८७/प्र.क्र.९८/२३-अ, दि.२१ ऑगस्ट, १९९१.

२. शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक : आरएलए-१०८९/१९९२/सीआर-९७/मिव्य-२, दिनांक १८ डिसेंबर, १९९८.

३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : शानिवा-१५९२/८१३२/२३-अ, दिनांक - ४ नोव्हेंबर, १९९२.

४. आयुक्त कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई, वाशी यांचे पत्र क्र.साशा कक्ष-१/इमारत/६३९, दिनांक - २१ जून, १९९३.

५. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - शानिवा-१५९३/४४३३/प्र.क्र.६६७/९३/२३-अ, दिनांक - ५.११.१९९३.

**प रि प त्र क**

वर नमूद केलेल्या प्रस्तावनेतील या विभागाच्या दिनांक ५.११.९३ च्या शासन परिपत्रकान्वये बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातून नवी मुंबई किंवा ठाणे परिसरातील शासकीय कार्यलयात बदली झाल्यानंतर नवीन मुंबई किंवा ठाणे येथे शासकीय निवासस्थान मिळेपर्यंतच्या कालावधीकरिता बृहन्मुंबईतीत शासकीय निवासस्थाने रिक्त करण्याचा आग्रह न धरणे, याच नियमानुसार भाडे आकारणे तसेच, नवी मुंबई किंवा ठाणे परिसरातील शासकीय कार्यालयातून बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात बदली झाल्यानंतर तेथील शासकीय निवासस्थान त्यांना जोपर्यंत बृहन्मुंबईत शासकीय निवासस्थान उपलब्ध होत नाही तोपर्यंत नियमानुसार भाडे आकारणी करुन ताब्यात ठेवण्यास परवानगी देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच, ज्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांची नवी मुंबईतून ठाणे येथे किंवा ठाणे येथून नवी मुंबई येथे बदली झाली असेल त्यांना देखिल हा नियम लागू करण्यात आला आहे.

२. हा निर्णय पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्यात आला आहे किंवा कसे याबाबत ब-याच कार्यालयाकडून विचारणा करण्यात आली असल्याने या संदर्भात असे कळविण्यात येते की, समक्रमांकाच्या दि.५.११.९३ अन्वये देण्यात आलेली सवलत ही, पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्यात आलेली नाही.

कृ.मा.प.

तसेच, अनुज्ञेय कालावधीहून अधिक कालावधीकरिता सरकारी अधिकारी/कर्मचा-यांच्या शासकीय निवासस्थानात वास्तव्य प्रित्यर्थ भाडेआकारणी शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.सीपीए-१४७०/४२८/१८, दि.१० फेब्रुवारी, १९७१ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

हे आदेश फक्त बृहन्मुंबई, नवी मुंबई आणि ठाणे जिल्हयापुरतेच मर्यादित आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग**

प्रति,

* १. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,

* २. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

* ३. प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

* ४. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

* ५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

६. सार्वजनिक बांधकाम विभाग (मिव्य), मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मंत्रालयीन विभाग,
८. अधीक्षक अभियंता, मुंबई सार्वजनिक बांधकाम मंडळ, मर्झबान स्ट्रीट, फोर्ट, मुंबई,
९. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई,
१०. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विभाग, सार्वजनिक बांधकाम, वरळी, मुंबई,
११. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, सार्वजनिक बांधकाम , अंधेरी, मुंबई,
१२. मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील बृहन्मुंबईतील सर्व विभाग, प्रमुख/कार्यालय प्रमुख,
१३. आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई,
१४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई,
१५. अधीक्षक अभियंता, ठाणे सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे,
१६. कार्यकारी अभियंता, ठाणे सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे,
१७. कार्यकारी अभियंता, मार्ग विभाग क्रमांक-३, पनवेल, जिल्हा रायगड,
१८. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई,
१९. निवड नस्ती,